**पर्यटन प्रोत्साहन योजना १९९९**
विक्रीकर आणि ऐषाआराम कराच्या
सवलतीचा कालावधी वाढविण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००४/२/प्र.क्र.३७/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २४ मे, २००४.

**वाचा**:- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमटीसी ०३९९/प्र.क्र.१४२/पर्यटन, दिनांक ८ जुलै १९९९.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमटीसी २०००/३/प्र.क्र.२४२/पर्यटन, दिनांक ३१ जुलै २०००.

**प्रस्तावना**:- शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमटीसी ०३९९/प्र.क्र.१४२/पर्यटन, दिनांक ८ जुलै १९९९ अन्वये शासनाने पर्यटन धोरण निश्चित केले होते. या निर्णयातील परिच्छेद-९ मध्ये सवलतीच्या पात्रतेसाठी तरतूद असून परिच्छेद-१० मध्ये काही करामध्ये सवलती देण्यात आल्या होत्या. सदर निर्णय दिनांक ३१ जुलै २००० च्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आला होता. प्रोत्साहन योजना १९९९ संदर्भात शासन निर्णयामध्ये दिलेल्या सवलतींचा कालावधी वाढविण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्या संदर्भात खालीलप्रमाणे निर्णय शासनाने घेतलेला आहे.

**शासन निर्णय**:- शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक एमटीसी ०३९९/प्र.क्र.१४२/पर्यटन, दिनांक ८ जुलै १९९९ अन्वये घोषित करण्यात आलेल्या पर्यटन प्रोत्साहन योजना १९९९ मधील पात्र घटकांना मिळणा-या विक्रीकर आणि ऐषाआराम कराच्या सवलतीसाठी विहीत केलेला कालावधी ३ वर्षावरुन जास्तीत जास्त ९ वर्षापर्यन्त किंवा प्रोत्साहनाची मर्यादा संपेपर्यन्त (गुंतवणूकीच्या १२५ टक्के) यापैकी जे लवकर होईल त्या कालावधीसाठी वाढविण्यास शासन मंजुरी देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ब. ग. शिर्के)
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव,
मा.वित्त मंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उद्योग मंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री, उर्जा यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अतिरिक्त मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
चेअरमन, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई,
विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
उद्योग आयुक्त, मुंबई,
सचिव, पर्यटन विभाग, भारत सरकार, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
संचालक, फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲण्ड इंडस्टी(FICCI)
आरकेडीया, १९५ नरीमन पॉइंट, मुंबई-४०० ०२१,
अध्यक्ष, हॉटेल ॲन्ड रेस्टॉरंट असोशिएशन (वेस्टर्न इंडिया), मुंबई,
अध्यक्ष, ट्रॅव्हल एजन्टस् असोशिएशन इंडिया, मुंबई,
अध्यक्ष, टूर ॲन्ड ट्रान्सपोर्ट ऑपरेटर्स असोशिएशन इंडिया, मुंबई,
भारतीय ॲम्युजमेंटस् पार्क ॲन्ड इंडस्ट्रीज, मुंबई,
सर्व सार्वजनिक उपक्रम, महाराष्ट्र शासन.